कृष्णा नदीवरील को.प.बंधारा नागठाणे ता.पलुस जि.सांगली बंधा-याच्या विशेष दुरुस्ती कामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता मिळणेंबाबत

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/( २३७ /१४)/ सिंव्य(कामे)
मंत्रालय, मुंबई
तारीख: १९ /०८/२०१४

वाचा

पत्र क्रमांकः १) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ,पुणे यांचे पत्र क्रमांक मकृखोविम/७११(१४ /२०११)/प्रशा४/ ३६४७ दि. १२.५.२०१४

२) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ,पुणे यांचे पत्र क्रमांक मकृखोविम/५९१४(३३९/२०१४)/प्रशा ४/ ५९५१ दि. ५.८.२०१४

प्रस्तावना

कृष्णा नदीवर इस्लामपूर शहरापासून १५ कि.मी. अंतरावर को.प.बंधारा नागठाणे सन १९८० साली बांधलेला आहे. बंधा-याची प्रकल्पीय सिंचनक्षमता ४३०७ हे. असून प्रत्यक्ष सिंचीत होणारे क्षेत्र सुमारे ११९६१ हे. इतके आहे. या बंधा-याच्या पाणीसाठयातून नागठाणा, शिरगांव, जुनेखेड, नवेखेड, वाळवा, मसुची वाडी साटपेवाडी, पुनदी, ताकारी, दुधारी, बनेवाडी,इ. गावांच्या लाभक्षेत्रास सिंचनासाठी पाणी उपलब्ध करुन दिले जाते तसेच २ प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजना, २ साखर कारखाने, विटा नगरपालिका व वरील सर्व गावांच्या ग्रामपंचायतींना बिगर सिंचनासाठी पाणी उपलब्ध करुन दिले जाते.साधारण २,४९,९६७ लोकसंख्येला पिण्यासाठी पाणी पुरविले जाते. बंधा-याचे एकूण ५४ गाळे आहेत. त्यापैकी सा.क्र. २०० मी. ते २७५ मी. गॉर्ज भागातील गाळा क्र.१ ते २५ मधील बंधारा सिलच्या दगडी बांधकामाची प्रचंड हानी झाल्याने गाळयात दरवाजे बसवून सुध्दा सिलच्या पायातून पाणी गळती मोठया प्रमाणात होते. या ठिकाणी पायाचे दगडी बांधकामात पोकळी निर्माण होवून दगडी बांधकाम निखळले आहे. त्यामुळे बांधकाम कमकुवत झाले आहे. उर्वरित गाळा क्र.२६ ते ५४ हे सुस्थितीत आहे. गॉर्ज भागातील दुरुस्ती केल्यामुळे संपूर्ण बंधारा पुनश्च १०० टक्के कार्यक्षमतेने कार्यान्वित करता येणार आहे. ही कामे सत्वर न केल्यास उर्वरित बंधा-याच्या चांगल्या भागास धोका पोहचून एकूण बंधा-याची स्थैर्यता धोक्यात येण्याची शक्यता आहे. बंधा-याच्या स्थैर्यास धोका निर्माण झाल्यास सिंचन व बिगर सिंचनासाठी तसेच पिण्यासाठीचा पाणी पुरवठा करणे अशक्य होईल त्यामुळे सर्वसाधारणपणे रु.१.०० कोटी प्रतीवर्षी शासनाचा महसुल बुडण्याची शक्यता नाकारता येत नाही. म्हणून बंधा-याचे विशेष दुरुस्तीचे कामाच्या प्रस्तावास विस्तार व सुधारणा अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

शासन निर्णय

या शासन निर्णयाव्दारे कृष्णा नदीवरील को.प.बंधारा नागठाणे ता.पलुस जि.सांगली बंधा-याच्या विशेष दुरुस्ती कामास रु. ३१७.७९ लक्ष (कामावरील खर्च रु २८८.९० लक्ष व रु २८.८९ लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टा प्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१) सदर विशेष दुरुस्ती प्रस्तावातील संधानकातील बाबीचे संकल्पचित्र / आराखडे तयार करुन त्यास सक्षम स्तरावर मान्यता घ्यावी

२) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी .

३)सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा

४) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्तेतीबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (Miles stones) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार miles stone साध्य करणे अपेक्षित असून जर त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी.

५) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

या कामावर होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा विशेष दुरुस्ती (१०)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ७४५२ ) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र ३० सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे .

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग-पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४( २७ (२) ) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत.या अधिकारानुसार व आंतरवित्तीय सल्लागार यांच्या सहमतीने हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१९१८१११८१४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.08.19 18:15:18 +05'30'

**कि.ल.संखे**
**शासनाचे कक्ष अधिकारी**

**प्रत,**

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
१०.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे
१३.मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक
१५. मुख्य अभियंता, (जसं) जलसंपदा विभाग, पुणे
१६.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे
२०.अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ(व्दारे), पुणे- १
२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२.कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र ५, नाशिक
२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१४/( २३७/१४)/ सिंव्य(कामे) दिनांक १९. ०८.२०१४ चे प्रपत्र

**परिशिष्ट**

| अ.क्र | लेखाशीर्ष | अंदाजीत खर्च (लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | सी- मुख्य शिर्ष कामे | २८८.९० |
| | **एकूण** | **२८८.९०** |
| | १० टक्के इ.टी.पी.चार्जेस | २८.८९ |
| | **एकूण** | **३१७.७९** |

कि.ल.संखे
शासनाचे कक्ष अधिकारी